# महाराष्ट्र विधानपरिषद

## पहिले (अर्थसंकल्प) अधिवेशन, २०१९

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

### मुंबई तसेच राज्यातील महत्वाची केंद्रे दुसऱ्या राज्यात हलविण्याचा निर्णय केंद्र शासनाने घेतल्याबाबत

**(१) ४१८० (०९-०४-२०१५). ॲड.रामहरी रुपनवर, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पालघर जिल्ह्यातील सुरक्षा केंद्र गुजरातमध्ये हलविण्यात आले, मुंबईतील गोदी बंद करण्याचा घाट घालण्यात येणे, मुंबईतील नियोजित वित्तीय केंद्र गुजरातमध्ये सुरु करण्याचा केंद्र शासनाचा निर्णय असल्याचे माहे फेब्रुवारी, २०१५ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मुंबई तसेच राज्यातील महत्वाची केंद्रे दुसऱ्या राज्यात हलविण्यामागील कारणे काय आहेत व याबाबत राज्य शासनाची भूमिका काय आहे,

(३) असल्यास, राज्य शासनाने उक्त प्रश्नाबाबत आपली भूमिका स्पष्ट न केल्यास त्यामागील कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०४-०२-२०१९) :** (१) सदर बाब केंद्र शासनाच्या अखत्यारितील असून केंद्र शासनाकडून असे कोणतेही आदेश राज्य शासनास प्राप्त झालेले नाहीत.

(२) प्रश्न उद्‌भवत नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पुसद-उमरखेड (जि.यवतमाळ) रस्त्यावर भीषण अपघात झाल्याबाबत

**(२) १९३९९ (१९-०८-२०१६). श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) यवतमाळ जिल्हयातील पुसद-उमरखेड रस्त्यावर तीन दुचाकींना ट्रॅक्टरने मागून धडक दिल्याने झालेल्या अपघातात सात जणांचा मृत्यू झाल्याची घटना दिनांक २१ एप्रिल, २०१६ रोजी वा त्यासुमारास घडली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर घटनेची शासनाने चौकशी करून तद्‌नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०५-०२-२०१९) :** (१) पुसद-उमरखेड या रस्त्यावर दिनांक २० एप्रिल, २०१६ रोजी एका मोटार सायकलस्वाराने ट्रॅक्टरला ओव्हरटेक करुन समोरुन येणाऱ्या मोटार सायकलला धडक दिल्याने, दोन्ही मोटार सायकलच्या समोरासमोर झालेल्या अपघातात ७ जणांचा मृत्यू झाला आहे.

(२) या प्रकरणी पोलिसांनी चौकशी करुन मोटार वाहन अधिनियमातील तरतुदीनुसार दोन्ही मोटार सायकल चालकांविरुध्द गु.र.क्र. १२५/२०१६ भा.दं.वि. कलम २७९, ३३८, ३०४-अ तसेच मोटार वाहन कायदा कलम ३/१८१, १२८/१७७, १२९/१७७, ११२/१८३, १८४ व १८५ अन्वये गुन्हा नोंदविला आहे.

या अपघातामधील दोन्ही आरोपी मोटार सायकल चालक मरण पावल्याने गुन्हयात तपासाअंती “ॲबटेड समरी” तयार करुन मंजूरीसाठी मा.न्यायदंडाधिकारी, पुसद यांचे न्यायालयात पाठविण्यात आली आहे.

अपघातातील मृत व जखमीच्या कुटुंबियांना नुकसान भरपाई दावा दाखल करण्यासाठी आवश्यक ती कागदपत्रे उपलब्ध करुन देण्यात आलेली आहेत.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## शिक्षकांसाठी आरोग्य विमाछत्र योजनेच्या प्रस्तावाबाबत

**(३) १९८७६ (२३-०८-२०१६). श्री.कपिल पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक १२४०० ला दिनांक १४ डिसेंबर, २०१५ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पोलीस कुटुंब आरोग्य योजनेच्या धर्तीवर शिक्षकांसाठी कॅशलेस आरोग्य योजना सुरु करण्याऐवजी राज्य शासन विमाछत्र योजनेच्या प्रस्तावावर विचार करत आहे, हे खरे आहे काय,

(२) तसेच शिक्षक परिषदेने विमाछत्र योजनेची तर शिक्षक भारतीने सावित्री-फातिमा शिक्षक कुटुंब कॅशलेस आरोग्य योजना सुरु करण्याची मागणी केली आहे, हे खरे आहे काय,

(३) असल्यास विमाछत्र योजनेचे स्वरुप काय आहे आणि त्यावर शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे ?

**श्री.विनोद तावडे (०५-०२-२०१९) :** (१), (२) व (३) राज्यातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांसाठी कॅशलेस आरोग्य योजना लागू करण्याची बाब शासनस्तरावर विचाराधीन असून त्याबाबतचे स्वरुप व नांव अद्याप निश्चित झालेले नाही.

---

## सेवानिवृत्त शिक्षकांना (पती/पत्नीसह) मोफत कॅशलेस वैद्यकीय सेवा मिळण्याबाबत

**(४) १९९६२ (२३-०८-२०१६). श्री.कपिल पाटील :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सेवानिवृत्त शिक्षकांना (पती/पत्नीसह) मोफत कॅशलेस वैद्यकीय सेवा देण्याची मागणी शिक्षक भारतीचे अध्यक्ष अशोक बेलसरे यांनी केली आहे, हे खरे आहे काय,
(२) केंद्र सरकार आणि त्यांची कॉर्पोरेशन्स यामध्ये असलेली अशा स्वरुपाची योजना महाराष्ट्रात लागू करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०५-०२-२०१९) :** (१), (२) व (३) शासन निर्णय, शिक्षण व सेवा योजन विभाग, दिनांक १२ मे, १९८९ अन्वये राज्यातील मान्यताप्राप्त व १००% अनुदानित शाळांमधील स्थायी व पूर्णवेळ शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती अनुज्ञेय करण्यात आलेली आहे. तथापि, त्या ऐवजी राज्यातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांसाठी कॅशलेस आरोग्य योजना लागू करण्याची बाब शासनस्तरावर विचाराधीन आहे.

---

## राजीव गांधी रुग्णालयात (जि.पुणे) कोट्यवधीची यंत्रसामुग्री विनावापर पडून असल्याबाबत

**(५) २१२८५ (१८-०८-२०१६). श्री.आनंद ठाकूर, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राजीव गांधी रुग्णालयात (जि.पुणे) कोट्यवधीची यंत्रसामुग्री विनावापर पडून असल्याचे माहे एप्रिल, २०१६ च्या शेवटच्या आठवड्यात निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०६-०२-२०१९) :** (१) व (२) पुणे महानगरपालिकेच्या राजीव गांधी रुग्णालयात नवजात अर्भक अतिदक्षता विभाग सुरु करण्यात येणार असून त्याकरीता आवश्यक उपकरणे खरेदी करण्यासाठी निविदा प्रक्रिया सुरु करण्यात आली होती. सद्य:स्थितीत निविदा प्रक्रिया पूर्ण झाली असून राजीव गांधी रूग्णालयात नवजात अर्भक अतिदक्षता विभाग कार्यरत झालेला आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नगरपरिषदेच्या शाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना वैद्यकीय प्रतिपूर्ती योजनेचा लाभ मिळत नसल्याबाबत

**(६) २१५६३ (२३-०८-२०१६). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नगरपरिषदेच्या शाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना वैद्यकीय प्रतिपूर्ती योजना १९८९ चा लाभ मिळत नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, याबाबत शासनस्तरावर काय कार्यवाही सुरु आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०५-०२-२०१९) :** (१), (२) व (३) नाही, राज्यातील नगरपरिषद शाळेतील प्राथमिक शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना वेतन अनुदान शालेय शिक्षण विभागाकडून देण्यात येते आणि वेतन अनुदानाच्या प्रमाणानुसार प्राथमिक शाळांमधील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती अनुज्ञेय करण्यात येते.

---

## महाराष्ट्र राज्यात जनऔषधी केंद्र सुरु करण्याबाबत

**(७) २३०२३ (२३-०८-२०१६). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) केंद्र शासनातर्फे या वर्षात देशभरात सुरु करण्यात येणाऱ्या ३००० जनऔषधी केंद्रांपैकी १०० जनऔषधी केंद्रे महाराष्ट्र राज्यात सुरु करण्यात येणार आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, यासंदर्भात केंद्र व राज्य शासन यांच्यामध्ये करार होणार आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर योजनेचे स्वरुप काय आहे व ही जनऔषधी केंद्रे राज्यात कोणकोणत्या ठिकाणी सुरु करावयाची याबाबत राज्य शासनाची भूमिका काय आहे,
(४) सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी किती कालावधी लागणार आहे ?

**श्री.गिरीष महाजन (०२-०२-२०१९) :** (१) व (२) अंशत: खरे आहे. या विभागाच्या नियंत्रणाखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रूग्णालयामध्ये जनऔषधी केंद्रे सुरू करण्याची ई-निविदा प्रक्रियाद्वारे स्वारस्याची अभिव्यक्ती मागविण्याची कार्यवाही संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांच्याकडून करण्यात आली आहे.
(३) केंद्र शासन पुरस्कृत जनऔषधी या योजनेबाबत केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांच्या अनुषंगाने विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व संलग्नीत रूग्णालयांमध्ये जेनेरीक औषधे विक्रीसाठी जागा एनजीओ/संस्था/को-ऑपेटिव्ह सोसायटी यांना देणेविषयी विहित पध्दतीने ई-निविदा नुसार स्वारस्याची अभिव्यक्ती प्रसिध्द करून पात्र निविदाकारांना दुकानांसाठी जागा उपलब्ध करून देण्यात येणार आहे.
(४) सदर ई-निविदा प्रक्रिया अंतिम टप्प्यात असून याबाबत त्वरित कार्यवाही करण्याच्या सूचना संचालनालयास देण्यात आल्या आहेत.

___________

## पुण्यातील अनुदानित महाविद्यालय अकरावी प्रवेशासाठी विद्यार्थ्यांकडून निर्धारीत शुल्कापेक्षा अधिक शुल्क आकारीत असल्याबाबत

**(८) २५६६३ (१६-१२-२०१६). श्री.अनिल भोसले, श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुण्यातील अनुदानित महाविद्यालय अकरावी प्रवेशासाठी विद्यार्थ्यांकडून निर्धारीत शुल्कापेक्षा अधिक शुल्क घेत असल्याचे माहे ऑक्टोबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार विद्यार्थ्यांकडून अधिकचे शुल्क घेणाऱ्या महाविद्यालयांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे कोणती आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०५-०२-२०१९) :** (१) अंशत: खरे आहे.

(२) निर्धारित शुल्कापेक्षा अधिक शुल्क घेऊ नये असे निर्देश महाविद्यालयांच्या प्राचार्यांना देण्यात आले आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील विनाअनुदानित व खाजगी शाळांतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांनी लाच घेतल्यास त्यांच्यावर कारवाई करण्याबाबत

**(९) ३०७५० (१२-०४-२०१७). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील विनाअनुदानित व खाजगी शाळांतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांनी लाच घेतल्यास त्यांच्यावर कारवाई करण्यात येणार असून त्याचे अधिकार शिक्षण संचालकांना देण्यात आले असल्याचे शासन निर्णय जारी करण्यात आल्याचे दिनांक १७ जानेवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०६-०२-२०१९) :** (१) अंशत: हे खरे आहे, दिनांक १४/०७/२०१६ व दिनांक ०९/०१/२०१७ च्या शासन निर्णयान्वये शिक्षण संचालकांना यासंदर्भात अधिकार प्रदान करण्यात आले होते. तथापि, न्यायालयीन प्रकरणानंतर दिनांक २९/०९/२०१७ च्या शासन निर्णयान्वये वरील इतर निर्णय अधिक्रमित केले आहेत.
(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पंतप्रधान आवास योजनेतील ४३ प्रकल्प कार्यान्वित नसल्याबाबत

**(१०) ३१०७९ (११-०८-२०१७). आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पंतप्रधान आवास योजनेतील ४३ प्रकल्प कार्यान्वित झाले नसल्याचे माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरील योजनेकरीता आवश्यक भूखंड संपादन करण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (०८-०२-२०१९) :** (१) हे खरे नाही.

प्रधानमंत्री आवास योजनेंतर्गत केंद्रीय मान्यता व सनियंत्रण समितीने मान्यता दिलेल्या ४६ प्रकल्पांपैकी माहे जुलै, २०१७ अखेर म्हाळुंगे, श्रीरामपूर, सांगली व नागपूर (वांजरा) येथील ४ प्रकल्पांचे काम सुरु आहे. १७ प्रकल्प सुरु करण्यासाठी निविदा प्रक्रिया पूर्ण झालेली आहे. उर्वरीत प्रकल्प पूर्ण करण्याची कार्यवाही वेगवेगळया टप्प्यावर सुरु आहे.

(२) प्रधानमंत्री आवास योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पांसाठी म्हाडा, स्थानिक स्वराज्य संस्था, शासकीय व निमशासकीय संस्था या अंमलबजावणी करणाऱ्या यंत्रणांना शासकीय जमीन रुपये १/- चौ.मी. या नाममात्र दराने प्रदान करण्याबाबत महसूल व वन विभागाने दिनांक १९/०९/२०१६ रोजी शासन निर्णय निर्गमित केला आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## इंदिरा गांधी शासकीय वैद्यकिय रूग्णालय (मेयो) नागपूर येथील रूग्णांना खाजगी रूग्णालयात योग्य उपचार करण्याची हमी देणाऱ्या दलालांबाबत

**(११) ३१२५६ (१८-०८-२०१७). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) इंदिरा गांधी शासकीय वैद्यकिय रूग्णालय (मेयो) नागपूर येथे ग्रामीण भागातून मोठ्या प्रमाणात येत असलेल्या रूग्णांना खाजगी रूग्णालयात योग्य उपचार करण्याची हमी देणारे दलाल सदर रुग्णालयाच्या परिसरात फिरत असल्याचे दिनांक ४ मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन संबंधित दलालांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (०४-०२-२०१९) :** (१) हे खरे नाही.
(२) प्रश्न उद्भवत नाही.
(३) लागू नाही.

---

## वसई औद्योगिक वसाहतीच्या दुरुस्तीबाबत

**(१२) ३१४६२ (१८-०८-२०१७). श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वसई औद्योगिक वसाहतीतील मराठी लघुउद्योजकांची मागील १० वर्षापासून स्पेशल रिपेअर फंडाच्या नावाखाली लूटमार सुरू असून वसाहतीतील इमारतींची देखभाल व दुरूस्ती होत नसल्यामुळे सदरहू इमारती कोसळण्याच्या स्थितीत असल्याने तेथील लघुउद्योजकांची गैरसोय होत आहे, हे खरे आहे काय,

(२) तसेच सोसायटीच्या इमारतीला लागून असलेल्या जमिनीखालील ७० हजार लिटर क्षमतेच्या पाण्याच्या टाकीमुळे या इमारतींच्या मूळ स्ट्रक्चरलाही धोका निर्माण झाला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सन २००७ मध्ये वोरा इंडस्ट्रीयल इस्टेट क्र. ४ या इमारतींच्या मेन्टेनंससाठी रूपये १८ लाख सोसायटी कार्यकारिणीकडून मंजूर केले असताना मागील १० वर्षापासून स्पेशल मेन्टेनंस फंड म्हणून दरमहा सोसायटी बिलाच्या माध्यमातून उद्योजकांकडून फंड गोळा करत असून वसई औद्योगिक वसाहतींच्या कार्यकारिणीच्या मनमानी कारभारामुळे व बेजबाबदारपणामुळे दुरूस्ती व देखभाल करण्यात आलेली नाही, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (०७-०२-२०१९) :** (१) नाही. व्होरा इंडस्ट्रीयल इस्टेट नं. ४ को-ऑप सोसायटी लि. वसई या संस्थेस एकूण ८३ गाळे असून, ७९ सभासद आहेत. संस्थेच्या सन २००२ मधील वार्षिक सर्वसाधारण सभेतील ठरावानुसार संस्थेच्या सर्व सभासदांकडून विशेष रिपेअर फंडाची रक्कम प्रति चौरस फुट रुपये ०.५० आकारण्यात येत होती. संस्थेच्या दिनांक १६/१३/२०१६ रोजीच्या वार्षिक सर्वसाधारण सभेत विशेष रिपेअर फंडाची रक्कम रुपये १.०० प्रति

चौरस फूट करण्याबाबत ठरावा पारित केलेला आहे. संस्थेच्या इमारतीचे ऑगस्ट, २०१७ मध्ये स्ट्रक्चर ऑडिट करुन घेण्यात आलेले असून, ऑडिट अहवालानुसार संस्थेच्या इमारतीस कोणताही धोका नसल्याचे संस्थेने नमुद केले आहे.

(२) नाही. संस्थेच्या इमारतीचे ऑगस्ट, २०१७ मध्ये स्ट्रक्चर ऑडिट करुन घेण्यात आलेले असून, ऑडिट अहवालानुसार संस्थेच्या इमारतीस पाण्याच्या टाकीमुळे धोका नसल्याचे संस्थेने नमुद केले आहे.

(३) नाही. संस्था सभासदांकडून वार्षिक सर्वसाधारण सभेतील ठरावानुसार स्पेशल रिपेअर फंड घेत आहे. परंतु, संस्थेच्या सभासदांनी संस्थेच्या आवारात अवैधरित्या केलेल्या बांधकामामुळे संस्थेच्या इमारतीची दुरुस्ती होऊ शकली नसल्याचे, संस्थेने नमुद करुन अशी अवैध बांधकामे काढून टाकण्याबाबत संबंधित सभासदांना नोटीसा दिल्या असल्याचे संस्थेने नमुद केले आहे.

(४) लागू नाही.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## इंदिरा गांधी शासकीय वैद्यकिय महाविद्यालय व रूग्णालय (मेयो) नागपूर येथील भुखंडावर असलेल्या खाजगी संस्थेच्या औषधालयाकडून रूग्णाची फसवणूक झाल्याबाबत

**(१३) ३१६३८ (१९-०८-२०१७). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) इंदिरा गांधी शासकीय वैद्यकिय महाविद्यालय व रूग्णालय (मेयो) नागपूर येथील भुखंडावर असलेल्या खाजगी संस्थेच्या औषधालयाकडून रूग्णांना औषधामध्ये सवलत न देता त्यांची फसवणूक होत असल्याचे दिनांक ४ मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन रुग्णांना फसविणाऱ्या औषधालयावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (०४-०२-२०१९) :** (१) हे खरे नाही.
(२) प्रश्न उद्‌भवत नाही.
(३) लागू नाही.

---

## शिक्षण सेवक मान्यतेच्या प्रस्तावाबाबत

**(१४) ३१७०४ (१८-०८-२०१७). ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात आदिवासी क्षेत्रासाठी पेसा कायदा लागू होण्यापूर्वी शिक्षण सेवक मान्यतेच्या प्राप्त प्रस्तावांपैकी काही विशिष्ट प्रस्तावांना अप्पर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे यांनी मान्यता दिली असल्याचे माहे मे, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, मान्य प्रस्तावांना पेसा कायदाची अट घालून प्रकल्प कार्यालय येथे परत पाठविण्यात आले असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, मान्य प्रस्तावांपैकी सौ. तेजस्वी पाटील, माध्यमिक आश्रमशाळा, शिरगांव, जि.पालघर यांचा शिक्षण सेवक मान्यतेचा प्रस्ताव शासनाच्या निकषात बसत असून सुध्दा प्रकल्प कार्यालय, डहाणू येथे परत पाठविण्यात आला, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, इतर सर्व प्रस्तावांना अप्पर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे कार्यालयामधून मान्यता दिली गेली असताना केवळ संबंधित शिक्षिकेच्या (सौ. तेजस्वी पाटील) मान्यतेचा प्रस्ताव निकाली न काढण्याची कारणे काय आहेत,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (१६-०१-२०१९) :** (१) प्रचलित शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार विहित पध्दतीने भरती प्रक्रिया राबवून संस्थेकडून प्रकल्प कार्यालयाच्या शिफारशीसह मान्यतेसाठी प्राप्त झालेल्या प्रस्तावांना अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे या कार्यालयाकडून मान्यता देण्यात आलेली आहे.

(२) मा.राज्यपाल महोदयांचे दिनांक ९ जून, २०१४ रोजीच्या अधिसूचनेनुसार अनुसूचित जमातीचे उमेदवार नियुक्त केले आहेत तसेच शासनाने पद भरती प्रक्रियेबाबत विहित केलेली कार्यपध्दती अवलंबून केलेल्या नियुक्त्यांना अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे या कार्यालयाकडून मान्यता देण्यात आली आहे.

मात्र मा.राज्यपाल महोदयांचे दिनांक ९ जून, २०१४ रोजीच्या अधिसूचनेनंतर अनुसूचित क्षेत्रातील अनुदानित आश्रमशाळांमध्ये शिक्षक संवर्गातील सरळसेवेने नियुक्ती दिलेले बिगर अनुसूचित जमातीच्या उमेदवारांचे प्राप्त प्रस्ताव नामंजूर करुन परत पाठविण्यात आले आहेत.

(३) व (४) श्रीमती तेजस्वी पाटील, माध्यमिक शिक्षिका, अनुदानित आश्रमशाळा शिगांव, जि.पालघर यांच्या नियुक्तीचा प्रस्ताव मान्यतेसाठी अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे या कार्यालयास प्राप्त झालेला होता. तथापि, सदर नियुक्ती ही प्रचलित कार्यपध्दतीनुसार व शासनाने विहित केलेल्या निकषानुसार केलेली नाही.

तसेच मा.राज्यपाल महोदयांचे दिनांक ९ जून, २०१४ रोजीच्या अधिसूचनेनुसार अनुसूचित क्षेत्रातील शिक्षक संवर्गातील पदे स्थानिक अनुसूचित जमातीतील उमेदवारांमधून भरण्याचे निर्देश असताना श्रीमती तेजस्वी सुनिल पाटील या “इमाव” प्रवर्गातील उमेदवारास नियुक्ती दिलेली आहे. त्यामुळे अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे या कार्यालयाने सदर प्रस्ताव नामंजूर करुन प्रकल्प अधिकारी, डहाणू यांना परत पाठविला आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पुणे-बेंगलोर राष्ट्रीय महामार्गावरील टोल गैरव्यहाराबाबत

**(१५) ३१८५३ (०७-०८-२०१७). श्रीमती विद्‌या चव्हाण, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.धनंजय मुंडे, ॲड.राहुल नार्वेकर, ॲड.निरंजन डावखरे, श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नियंत्रक व महालेखा परिक्षकानी दिनांक ७ एप्रिल, २०१७ रोजी सादर केलेला अहवालात पुणे-बेंगलोर राष्ट्रीय महामार्गावरील किनी आणि तासवडे

येथील टोल वसुलीसाठी माहे फेब्रुवारी, २०१४ मध्ये काढलेल्या निविदेनुसार दोन वर्षाच्या कामासाठी राज्य रस्ते विकास मंहामंडळाच्या अधिकारी यांनी कंत्राटदारासोबत संगणमत करून शासनाचे रूपये ५४ कोटी ५९ लाखाचे आर्थिक नुकसान केले तर, ठेकेदाराकडे रूपये ६६ कोटी ६० लाख अडकुन असणे तसेच ठाण्यात कापुरबावडी येथील उड्डाण पुलाकरीता रूपये १ कोटी ६५ लाख अनावश्यक खर्च केल्याचा आरोप केला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने शासनाने सदर अहवालातील नियंत्रक व महालेखा परिक्षकानी ठपका ठेवलेल्या रक्कमा ठेकेदाराकडून आणि संबंधित राज्य रस्ते विकास महामंडळाच्या अधिकाऱ्याकडून वसुल करण्याबाबत कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (३१-०१-२०१९) :** (१) महालेखाकार, (लेखा परिक्षा) - III महाराष्ट्र यांनी सातारा-कागल महामार्ग प्रकल्पाबाबत महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळावर रुपये ५५ कोटी इतका आर्थिक नुकसानीचा ठपका न ठेवता दिनांक ०७/१०/२०१६ रोजीच्या पत्रान्वये आकडेवारीतील तथ्य तपासणीसाठी महामंडळास कळविले आहे.

महामंडळाने प्रस्तुत प्रकल्पाच्या टोल कंत्राटदारास रुपये ५८.७६ कोटी व त्यावरील व्याज भरण्याबाबत कळविले असून त्याप्रमाणे पाठपुरावा सुरु आहे.

कापूरबावडी, ठाणे येथील उड्डाणपुलाकरीता जास्तीची रक्कम खर्च केल्याचा आक्षेप घेण्यात आला आहे, हे खरे आहे.

(२) पुणे-बेंगलोर महामार्गावरील (किणी व तासवडे) बाबत चौकशी करण्याचा प्रश्न उद्‌भवत नाही.

कापूरबावडी, ठाणे येथील उड्डाणपुलाकरीता अदा करण्यात आलेली रुपये १ कोटी ६५ लाख रक्कम कंत्राटदाराच्या अंतिम देयकातून वसूल करण्यात आली आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## शासनाच्या विविध खात्याकडून मुंबई महापालिकेची रक्कम थकित असल्याबाबत

**(१६) ३२६८५ (११-०८-२०१७). ॲड.अनिल परब :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्य शासनाकडून मुंबई महानगरपालिकेला मिळणारे अनुदान आणि विविध शासकीय कार्यालयाकडून भरला जाणारा करापोटी महानगरपालिकेचे रुपये ३५२३ कोटी ३१ लाख एवढी रक्कम थकीत असल्याचे माहे मे, २०१७ मध्ये त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर निधी रखडल्यामुळे महानगरपालिकेमार्फत मुंबई शहर व उपनगरात सुरु असलेले नागरी प्रकल्प पूर्ण करण्यासाठी आर्थिक कोंडी निर्माण झाली असल्याने सदर निधी तात्काळ महानगरपालिकेला देण्यात यावा असे मागणी पत्र मुंबईचे महापौर यांनी मा.मुख्यमंत्री यांना माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान पाठविले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, मुंबईतील वाढती लोकसंख्या आणि नागरी सुविधांची मागणी यादृष्टीने महापालिकेला नियोजन करणे व विविध प्रकल्प राबविणे सुकर व्हावे यासाठी राज्य शासनाकडे असलेला थकित निधी अदा करण्याबाबत करावयाच्या निर्णयात्मक कार्यवाहीची सद्यःस्थिती काय आहे व किती कालावधीत पूर्ण निधी महानगरपालिकेला देण्यात येणार आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०४-०२-२०१९) :** (१) राज्य शासनाच्या विविध कार्यालयांकडून बृहन्मुंबई महानगरपालिकेस प्राप्त होणारी सहाय्यक अनुदाने तसेच मालमत्ता कर, पाणीपट्टी, मलनि:सारण आकार शासनाच्यावतीने गोळा करण्यात आलेल्या विविध करांवरील वटावाच्या रकमा इत्यादी पोटी महानगरपालिकेस माहे मार्च, २०१७ अखेरपर्यंत रुपये ३८८१.३६ कोटी इतकी रक्कम देय आहे.

(२) सदर प्रकरणी मा.महापौर, बृहन्मुंबई महानगरपालिका यांनी दिनांक १८/०३/२०१७ रोजी पत्र पाठविले आहे.

(३) व (४) राज्य शासन व बृहन्मुंबई महानगरपालिका यांनी परस्परांना देय असलेल्या रकमांचे समायोजन ही निरंतर चालणारी प्रक्रिया आहे.

---

## स्थानिक स्वराज्य संस्थेच्या शाळांबाबत

**(१७) ३४०९५ (११-०८-२०१७). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) स्थानिक स्वराज्य संस्थेच्या १ ते ४ वर्गाच्या शाळांना ५ वी चा वर्ग व ५ वी ते ७ वी च्या शाळांना ८ वी चा वर्ग सरसकट जोडण्याचे आदेश शासनाने दिले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, आर.टी.ई. नियम २०११ मधील नियम ४ (१) (क) व (ख) मधील अटींचे उल्लंघन झाले हे शासनास मान्य आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर शासन आदेशामुळे सर्व सुविधा असलेल्या माध्यमिक शाळेत विद्यार्थ्यांचा अभाव व सुविधांचा अभाव असलेल्या प्राथमिक शाळेतही विद्यार्थ्यांचा अभाव या स्थितीमुळे बालकांचे शिक्षण धोक्यात आले हे शासनास ज्ञात आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, माध्यमिक शाळेची सुविधा असलेल्या ठिकाणी सुरु झालेले स्थानिक स्वराज्य संस्थेच्या शाळेतील इयत्ता ५ वी व ८ वी चे वर्ग शासन बंद करीत आहे काय,

(५) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०१-०२-२०१९) :** (१) आवश्यकतेनुसार इयत्ता ५ वी चा वर्ग व इयत्ता ८ वी चा वर्ग जोडण्यासंदर्भात कार्यपध्दती शासन निर्णय दिनांक २/७/२०१३ अन्वये विहीत केली आहे.

(२) हे खरे नाही.

(३), (४), (५) व (६) प्रश्न उद्भवत नाही.

---

# राज्यातील खाजगी मान्यता प्राप्त अनुदानित शाळेतील शिक्षकांना वैद्यकीय सुविधा देण्याबाबत

**(१८) ३४३०४ (१८-०८-२०१७). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील खाजगी मान्यता प्राप्त अनुदानित शाळेतील कर्मचाऱ्यांची वैद्यकीय देयके पारित केली जातात, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, दिनांक १९ सप्टेंबर, २०१६ च्या शासन आदेशाने १६२८ शाळा व २४५२ तुकड्यांना सरसकट २० टक्के अनुदान देण्याचा शासन निर्णय निर्गमित झाला, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर शाळांवर काम करणारे कर्मचारी मागील १५ ते १६ वर्ष विनाअनुदानित कार्यरत असून ते १०० टक्के अनुदानास पात्र असून २० टक्के प्रमाणे वेतन घेत आहेत, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर शिक्षकांना त्यांच्या सेवेच्या प्रमाणात वैद्यकीय सुविधा देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०५-०२-२०१९) :** (१) अंशत: खरे आहे, राज्यातील १००% अनुदानित खाजगी शाळांमधील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती अनुज्ञेय आहे.

(२) हे खरे आहे.

(३) अंशत: खरे आहे.

(४) राज्यातील १००% अनुदानित खाजगी शाळांमधील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती अनुज्ञेय आहे. त्यामुळे २०% अनुदानास पात्र असलेल्या खाजगी शाळा १००% अनुदानास पात्र झाल्यावर सदर शाळेतील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना वैद्यकीय प्रतिपूर्ती अनुज्ञेय राहील.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

___

## बृहन्मुंबई महानगरपालिका व झोपडपट्टी पुनर्विकास प्राधिकरण यांनी बोगस भोगवटा प्रमाणपत्र निर्गमित केल्याबाबत

**(१९) ३४६५४ (१३-११-२०१७). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) बृहन्मुंबई महानगरपालिका व झोपडपट्टी पुनर्विकास प्राधिकरण यांचेकडून ३९४ प्रकरणांमध्ये बोगस भोगवटा प्रमाणपत्र निर्गमित करण्यात आल्याची बाब माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, दिनांक ३१ जुलै, २०१७ पर्यंत या प्राधिकरणाकडे भोगवटा प्रमाणपत्र अप्राप्त असलेल्या सर्व प्रकल्पांची नोंदणी करणे बंधनकारक असताना अनेक प्रकल्पांची नोंदणी करण्यात आलेली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, अनेक विकासक प्राधिकरणाकडील नोंदणीपासून स्वत:चे प्रकल्प वाचविण्याकरीता अनेक विकासकांनी प्रकल्प / इमारती पूर्ण नसताना देखील प्राधिकरणाकडुन बोगस भोगवटा प्रमाणपत्र घेतले आहेत, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, यामुळे ग्राहक व शासनाची फसणुक झालेली असल्यामुळे संबंधित प्रकरणी उच्चस्तरीय चौकशी करण्याची मागणी लोकप्रतिनिधींनी माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान केली आहे, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने उच्चस्तरीय चौकशी केली वा करण्यात येत आहे काय व तद्नुसार दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०४-०२-२०१९) :** (१), (२), (३) व (४) अशी बाब निदर्शनास आली नसल्याचे गृहनिर्माण विभाग व बृहन्मुंबई महानगरपालिका यांनी कळविले आहे.

(५) व (६) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील शहरी व ग्रामीण भागातील शाळांमध्ये पाच दिवसाचा आठवडा करण्याबाबत

**(२०) ३५१३७ (०२-०१-२०१८). श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, डॉ.सुधीर तांबे, श्री.दत्तात्रय सावंत : तारांकित प्रश्न क्रमांक ३३४४७ ला दिनांक ८ ऑगस्ट, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील सर्व प्रकारच्या शहरी व ग्रामीण भागातील शाळांमध्ये सोमवार ते शुक्रवार असा पाच दिवसाचा आठवडा करण्याचा शालेय शिक्षण विभागाने निर्णय घेतला आहे, त्यानुसार राज्यातील किती शाळांनी कार्यवाही केली आहे,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, तसेच घेतलेल्या निर्णयाचे स्वरुप काय आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०२-०२-२०१९) :** (१) हे खरे नाही.

शासन निर्णय, दिनांक २९/०४/२०११ अन्वये शिक्षकांचे किमान दिवस व शिक्षणाचे तास विहीत केले असून त्यानुसार शाळांनी कार्यवाही करावयाची आहे.

(२) प्रश्न उद्भवत नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील २० टक्के अनुदान घेत असलेल्या शाळांतील कर्मचाऱ्यांना वैद्यकीय सुविधा देण्याबाबत

**(२१) ३५६२६ (०३-०१-२०१८). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात दिनांक १९ सप्टेंबर, २०१६ च्या शालेय शिक्षण विभागाच्या शासन निर्णयाने १६२८ शाळा व २४५२ वर्ग तुकड्यावर कार्यरत असणाऱ्या कर्मचाऱ्यांना माहे सप्टेंबर, २०१६ पासून २० टक्के अनुदान देण्यात येत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर २० टक्के अनुदान घेत असलेल्या शाळेतील कर्मचारी यांना महागाई भत्ता, घरभाडे व वेतनवाढी दिल्या जात असून सदर शिक्षकांच्या व त्यांच्या कुटुंबियांच्या आरोग्यासाठी देण्यात येणारी वैद्यकीय सहाय्यता दिली जात नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, नियमानुसार सदर शाळा व वर्ग तुकड्या या १०० टक्के अनुदानास पात्र असूनही शासनाच्या आर्थिक स्थितीमुळे या शिक्षकांना २० टक्के अनुदान दिले जाते, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन उक्त शाळेतील व वर्ग तुकड्यावर कार्यरत असणाऱ्या कर्मचाऱ्यांना इतर सुविधाप्रमाणे वैद्यकीय सुविधा मिळणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०५-०२-२०१९) :** (१) शासन निर्णय, दिनांक १९ सप्टेंबर, २०१६ अन्वये १६२८ शाळा व २४५२ वर्ग तुकड्यांवरील शिक्षक व शिक्षकेतर पदांना दिनांक १ सप्टेंबर, २०१६ पासून २० टक्के अनुदान मंजूर केले आहे.
(२) होय, हे खरे आहे.
(३) होय, हे खरे आहे.
(४) राज्यातील १००% अनुदानित खाजगी शाळांमधील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती अनुज्ञेय आहे. त्यामुळे २०% अनुदानास पात्र असलेल्या खाजगी शाळा १००% अनुदानास पात्र झाल्यावर सदर शाळेतील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना वैद्यकीय प्रतिपूर्ती अनुज्ञेय राहील.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबईतील तलावांचे पुनरुज्जीवन करण्याबाबत

**(२२) ३५६५३ (०४-०१-२०१८). श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.रामनिवास सिंह, श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील याआधी अस्तित्वात असलेल्या ८६ तलावांपैकी सुमारे ६६ तलाव नष्ट होण्याच्या मार्गावर असल्याचे एका संस्थेच्या अहवालातून निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, यामध्ये सुमारे ८ तलाव पूर्णपणे नष्ट झाल्याचे अहवालातून निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, या तलावांच्या ठिकाणी अतिक्रमण होऊन त्या ठिकाणी इमारती बांधल्या जात असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी करून मुंबईतील तलावांचे पुनरुज्जीवन करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०४-०२-२०१९) :** (१) मुंबईतील ८६ तलावांपैकी सुमारे ६६ तलाव नष्ट होण्याच्या मार्गावर असल्याबाबतचा अहवाल परिमंडळ-१ मधील विविध विभागांकडे उपलब्ध नाही असे बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.
(२) हे खरे नसल्याचे बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.
(३) बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या उर्वरित विभागांतील महानगरपालिकेच्या मालकीच्या तलावांच्या ठिकाणी कोणतेही अतिक्रमण नसल्याचे महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.
(४) व (५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## औरंगाबाद शहरातील एकनाथ नगर येथील रेल्वे क्रॉसिंगवरील उड्डाण पूलाचे काम निधी अभावी प्रलंबित असल्याबाबत

**(२३) ३७००० (०३-०१-२०१८). श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्री.दत्तात्रय सावंत, डॉ.सुधीर तांबे, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) औरंगाबाद शहरातील एकनाथ नगर येथे रेल्वे क्रॉसिंग बंद करुन तेथे उड्डाण पुल बांधण्याचे काम निधी अभावी प्रलंबित असल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदर उड्डाण पुलासाठी निधी उभारुन पुलाचे काम पूर्ण करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०४-०२-२०१९) :** (१) व (२) औरंगाबाद येथील एकनाथ नगर उड्डाण पूल बांधण्यासाठी येणारा खर्च हा औरंगाबाद महानगरपालिका व एम.आय.डी.सी. यांनी प्रत्येकी ५०% या प्रमाणात करण्याचा निर्णय महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेत सन २००६ मध्ये झाला होता.

तथापि, औरंगाबाद औदयोगिक क्षेत्र हे महानगरपालिकेस हस्तांतरित केल्यामुळे उड्डाण पूल बांधण्याच्या कामात आर्थिकदृष्टया सहभागी होणे शक्य नसल्याबाबत एम.आय.डी.सी. औरंगाबाद यांनी महानगरपालिकेस कळविले आहे. त्यामुळे प्रस्तावित उड्डाण पूलाचे काम सुरु होऊ शकलेले नाही, ही वस्तुस्थिती आहे.

निधीच्या उपलब्धतेनुसार औरंगाबाद महानगरपालिकेमार्फत सदर उड्डाण पूलाचे काम हाती घेण्यात येईल, असे औरंगाबाद महानगरपालिकेने कळविलेले आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सर्व शिक्षा अभियानांतर्गत करार पध्दतीने कार्यरत अधिकारी व कर्मचारी यांना सेवेत कायम करण्याबाबत

**(२४) ३८१२० (०५-०४-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सर्व शिक्षा अभियानांतर्गत करार पध्दतीने कार्यरत अधिकारी व कर्मचारी यांना सेवेत सामावून कायम करण्याबाबत राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र

प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी दिनांक १४ जून, २०१७ रोजी प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग यांना पत्र पाठवून कार्यवाही करण्याचे कळविले, हे खरे आहे काय,
(२) तसेच नागपूर विभागाच्या लोकप्रतिनिधींनी शासनास दिनांक १४ नोव्हेंबर, २०१७ रोजी निवेदन पाठवून उपरोक्त प्रकरणाबाबत त्वरीत निर्णय घेण्याची विनंती केली, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०५-०२-२०१९) :** (१), (२), (३) व (४) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांचेकडून दिनांक १४ जून, २०१७ रोजीच्या पत्रान्वये सर्व शिक्षा अभियानांतर्गत करार पध्दतीने कार्यरत अधिकारी व कर्मचारी यांना सेवेत सामावून कायम करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने अद्‌याप निर्णय झालेला नाही.

---

## मुंबईतील “एल” विभागात अनधिकृत बांधकाम झाल्याबाबत

**(२५) ४०४३८ (०६-०४-२०१८). श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईतील “एल” विभागात झालेल्या अनधिकृत बांधकामाबाबत मा.मुख्यमंत्री यांना लेखी निवेदन स्थानिक लोकप्रतिनिधी व नागरीकांनी दिनांक ३० नोव्हेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास दिले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, मा.मुख्यमंत्री यांना दिलेल्या निवेदनाचे सर्वसाधारण स्वरुप काय आहे,
(३) असल्यास, सदर निवेदनानुसार शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०४-०२-२०१९) :** (१) व (२) बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या "एल" विभागात अतिक्रमण करुन तळमजला ते २ मजल्यांचे अनधिकृत बांधकाम अशा आशयाच्या दिनांक २७/११/२०१७ रोजीच्या दोन तक्रारी प्राप्त झाल्या आहेत.

(३) व (४) कुर्ला "एल" विभागात एकूण १६ प्रभाग येत असून, सदर प्रभाग विस्तृत झोपडपट्टीने व्यापलेला आहे. सदर घोषित झोपडपट्टी क्षेत्रामध्ये कारवाई करण्याबाबतचे अधिकार सक्षम प्राधिकारी म्हणून संबंधित उपजिल्हाधिकारी (अति. निष्कासन) यांना आहेत. तसेच, दिनांक २३/०५/२०१६ रोजीच्या शासन निर्णयानुसार, म्हाडा अभिन्यासामधील भूखंडावर कारवाई करण्याचे अधिकार नियोजित प्राधिकरण म्हणून म्हाडा प्राधिकरणास देण्यात आले आहेत.

उर्वरित ठिकाणी मुंबई महानगरपालिका अधिनियम १८८८ व महाराष्ट्र प्रादेशिक नगररचना अधिनियम १९६६ नुसार कारवाई करण्यात येते.

तसेच, अनधिकृत बांधकाम करणारे मालक/ताबेदार व कंत्राटदार यांच्यावर स्थानिक पोलीस ठाणे येथे महाराष्ट्र प्रादेशिक नगररचना अधिनियम १९६६ मधील विहित तरतुदीनुसार गुन्हे दाखल करण्यात येतात.

---

## नांदेड जिल्हयातील बारुळ परिसरातील रस्त्यांची दुरवस्था झाल्याबाबत

**(२६) ४०६८१ (०५-०४-२०१८). श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, ॲड.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नांदेड जिल्हयातील बारुळ परिसरातील राज्य मार्ग व जिल्हा मार्ग रस्त्यावरील रस्त्यांची दुरुस्तीचे काम निकृष्ट दर्जाचे करण्यात आल्यामुळे सदर रस्त्यांवर १५ दिवसातच पुन्हा खड्डे पडून रस्त्यांची दुरवस्था झाल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने निकृष्ट दर्जाचे काम करणाऱ्या ठेकेदारावर कारवाई करून सदर रस्त्यांची योग्य प्रकारे दुरुस्ती करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०८-०२-२०१९) :** (१) हे खरे नाही.
(२) प्रश्न उद्‌भवत नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील अशासकीय प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांतील शिक्षक व कर्मचाऱ्यांच्या वैद्‌यकीय प्रतिपूर्ती देयकास त्वरीत मान्यता मिळणेबाबत

**(२७) ४१५३९ (१९-०८-२०१३). डॉ.सुधीर तांबे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील अशासकीय प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांमधील शिक्षक व कर्मचाऱ्यांना एक लाखांच्या वर असलेले वैद्‌यकीय प्रतिपूर्तीचे देयके मान्यता मिळणेकरीता सचिव, शालेय शिक्षण विभागाकडे पाठविले जातात, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सन २०१०-११ पासून शासनाकडे अंदाजे ३००० च्या वर वैद्‌यकीय प्रतिपूर्तीचे देयके प्रलंबित आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, या प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले,
(४) असल्यास, याबाबत शासनाने केलेल्या कार्यवाहीचे स्वरुप काय आहे,
(५) नसल्यास, विलंबाच कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०५-०२-२०१९) :** (१), (२), (३) व (४) शालेय शिक्षण विभागाच्या शासन निर्णय, दिनांक २९/०४/२०१६ अन्वये राज्यातील शिक्षक व

शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना वैद्यकीय खर्चाच्या अनुज्ञेयतेची कमाल मर्यादा व मंजूरीच्या अधिकारामध्ये सुधारणा करण्यात आलेली असून त्याअन्वये रुपये २,००,०००/- पर्यंतच्या वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीस मंजूरीचे अधिकार संबंधित विभागाच्या कार्यालय प्रमुख यांना प्रदान करण्यात आले आहेत. रुपये २,००,०००/- पेक्षा जास्त व रुपये ३,००,०००/- पर्यंतच्या वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीस मंजूरीचे अधिकार संबंधित विभागाच्या विभाग प्रमुखांना प्रदान करण्यात आलेले आहेत. तर रुपये ३,००,०००/- वरील वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीच्या प्रकरणांबाबत मंजूरीचे अधिकार मंत्रालयीन प्रशासकीय विभागाला आहेत.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कृषी उत्पन्न बाजार समितीच्या नियमनातून नेमलेल्या अभ्यासगट समितीने अहवाल शासनास सादर केला नसल्याबाबत

**(२८) ४२४७२ (०१-०८-२०१८). ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, डॉ.सुधीर तांबे, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.सुभाष झांबड, ॲड.रामहरी रुपनवर, प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.हरिसिंग राठोड :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासनाने कृषी उत्पन्न बाजार समितीच्या नियमनातून अन्नधान्य-कडधान्य मुक्त करण्यासाठी माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये नेमलेल्या अभ्यासगट समितीने आपला अहवाल शासनास सादर केला नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर समितीस अहवाल सादर करण्यास होत असलेल्या विलंबाची सर्वसाधारण कारणे काय आहेत व सदरहू अहवाल किती कालावधीत सादर होणे अपेक्षित आहे,

(३) असल्यास, सदरहू अहवाल शासनास सादर करण्यात आला असल्यास अहवालातील शिफारशींचे थोडक्यात स्वरूप काय आहे ?

**श्री.सुभाष देशमुख (०६-०२-२०१९) :** (१) होय.
(२) सदर समितीमध्ये काही नवीन सदस्यांचा नव्याने समावेश केल्याने त्यांचे म्हणणे व सूचना ऐकून घेणे आवश्यक आहे. त्यामुळे समितीचा अहवाल सादर करण्यास आणखी काही कालावधी लागणार आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्य पुराभिलेख संचालनालयातील कर्मचाऱ्यांना सहाय्यक संचालक पदावर पदोन्नती देण्याबाबत

**(२९) ४२६४४ (०२-०८-२०१८). डॉ.परिणय फुके :** सन्माननीय **सांस्कृतिक कार्य मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सन १६३० पासूनचे राज्याचे रेकॉर्ड सांभाळणाऱ्या राज्य पुराभिलेख संचालनालयातील सहाय्यक संचालक गट-ब (राजपत्रित) व उपसंचालक गट-अ (राजपत्रित) या पदांच्या सेवा प्रवेश नियमास सन २०१२-२०१३ च्या दरम्यान मा.राज्यपाल महोदयांची मंजूरी मिळाली, सन २०१२-२०१३ मध्ये मंजूरी मिळूनही सदरहू पदांचे सेवा प्रवेश नियम चार वर्षाचा कालावधी होऊनही पारित करण्यात आले नाहीत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, संचालनालयातील मुंबई, पुणे, औरंगाबाद, नागपूर, कोल्हापूर या विभागीय कार्यालयातील सर्व सहाय्यक संचालकांची पदे सन २०१२ पुर्वीपासून रिक्त आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सहाय्यक संचालक पदांवर पदोन्नतीस संचालनालयातील कर्मचारी पात्र असतानाही केवळ सेवा प्रवेश नियम पारित नसल्याने गेली ४ वर्षापासून कर्मचाऱ्यांना पदोन्नतीपासून वंचीत रहावे लागले आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, निमयबाहयरित्या बाहेरील विभागातील कर्मचाऱ्यांना सहाय्यक संचालक पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती तसेच अतिरिक्त कार्यभार सोपवून पात्र कर्मचाऱ्यांवर अन्याय करण्यात आला आहे, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन संचालनालयातील कर्मचाऱ्यांना सहाय्यक संचालक पदावर पदोन्नती देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०२-०२-२०१९) :** (१) होय.
(२) अंशतः खरे आहे.

मुंबई पुरालेखागारात २ तसेच औरंगाबाद, कोल्हापूर व नागपूर पुरालेखागारात प्रत्येकी एका सेवाजेष्ठ कर्मचाऱ्यास सहाय्यक संचालक पदाचा अतिरिक्त कार्यभार देण्यात आला आहे. पुणे विभागाच्या सहाय्यक संचालक या पदासाठी प्रतिनियुक्तीने अधिकारी उपलब्ध करुन देण्यात आला आहे.
(३) पुराभिलेख संचालनालयातील कर्मचारी वृंदाचे सेवा प्रवेश नियम तयार करण्याची कार्यवाही सुरु आहे.
(४) हे खरे नाही.
(५) संबंधित पदांचे सेवा प्रवेश नियम तयार झाल्यानंतर याबाबत कार्यवाही करण्यात येईल.
(६) लागू नाही.

---

## पुण्यातील कोरेगाव भीमा 'महाराष्ट्र बंद' प्रकरणातील गुन्हे मागे घेण्याबाबत

**(३०) ४२७६१ (०२-०८-२०१८). श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.अनिल भोसले, श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पुण्यातील कोरेगाव-भीमा येथील दंगलीनंतर पुकारण्यात आलेल्या 'महाराष्ट्र बंद' मध्ये दाखल करण्यात आलेले गुन्हे मागे घेण्यात येतील अशी घोषणा मा.मुख्यमंत्र्यांनी विधिमंडळ सभागृहात केली असूनही याबाबतचा कोणताही अध्यादेश मा.मुख्यमंत्री अथवा गृह विभागाने अद्यापही काढलेला नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०७-०२-२०१९) :** (१) व (२) गृह विभाग, शासन निर्णय, क्र. पीआरओ-०४१८/प्र.क्र.१४२/विशा-२, दिनांक २६/१०/२०१८ अन्वये कोरेगांव भिमा (जि.पुणे) येथे दिनांक ०१/०१/२०१८ रोजी घडलेल्या घटनेच्या अनुषंगाने झालेले आंदोलन यासंदर्भात दाखल झालेले खटले मागे घेण्यासाठी अपर पोलीस महासंचालक (का. व सु.), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली आहे. सदर समितीला उपरोक्त करण्यात आली आहे. सदर समितीला उपरोक्त घटनांच्या अनुषंगाने खटले मागे घेण्याच्या संदर्भात उचित कार्यवाही करण्यासाठी पुढीलप्रमाणे अटी विहीत करण्यात आल्या आहेत :-

१) अशा घटनेत जिवित हानी झालेली नसावी आणि,
२) अशा घटनेत खाजगी व सार्वजनिक मालमत्तेची रुपये १०,००,०००/- पेक्षा जास्त हानी झालेली नसावी,
३) पोलिसांवर थेट हल्ला करण्यांवरील केसेस मागे घेता येणार नाही. याकरीता व्हिडीओ फुटेज तपासण्यात येईल.

सदर समिती सर्व पोलीस आयुक्त व सर्व जिल्हा पोलीस अधिक्षक यांच्याकडून माहिती घेऊन, त्यावर उचित कार्यवाही करुन स्वयंस्पष्ट शिफारशींसह शासनास अहवाल सादर करील. विधी व न्याय विभागाचे अभिप्राय घेण्यात येतील. विधी व न्याय विभागाचे अभिप्राय प्राप्त झाल्यावर मंत्रिमंडळ उपसमितीच्या मान्यतेने शासनस्तरावर उचित कार्यवाही करण्यात येईल.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राष्ट्रीय महामार्ग, उड्डाणपूल यासाठी लागणाऱ्या भूसंपादनाच्या निधीची रक्कम राज्य शासनाने देण्याच्या निर्णयाबाबत

**(३१) ४२८९८ (०२-०८-२०१८). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.हरिसिंग राठोड, श्री.जनार्दन चांदूरकर, श्री.सुभाष झांबड, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.चंद्रकांत रघुवंशी, प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राष्ट्रीय महामार्गावरील उड्डाणपूल तसेच रेल्वेवरुन अथवा खालून जाणाऱ्या रस्त्यांच्या उभारणीसाठी आवश्यक भूसंपादन राज्य शासनाच्या निधीतून करण्याबाबतचा निर्णय शासनाने दिनांक १७ एप्रिल, २०१८ रोजी वा त्यासुमारास घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, निर्णयाचे स्वरुप काय आहे व सदर निर्णय घेण्याची कारणे काय आहेत,

(३) असल्यास, उक्त निर्णयामुळे राज्य शासनावर किती आर्थिक बोजा पडणार आहे व सदर निधी कशाप्रकारे उभारण्यात येणार आहे,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०६-०२-२०१९) :** (१), (२), (३), (४) व (५) राष्ट्रीय महामार्गावरील नागरी क्षेत्रातील उड्डाणपूल, आरओबी, आरयुबी यांच्या कामाच्या अनुषंगाने राष्ट्रीय महामार्ग प्राधिकरणाची (NHAI) वैधानिक जबाबदारी नसलेल्या जागा संबंधित नागरी स्वराज्य संस्थांमार्फत टीडीआर किंवा विकास योजनेत आवश्यक बदल करुनही उपलब्ध न झाल्यास सदर जागा संपादित करुन देण्यासाठी संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थाना महाराष्ट्र सुवर्णजयंती नगरोत्थान महाभियानाच्या माध्यमातून निधी उपलब्ध करुन देण्याबाबतचा निर्णय शासनाने दिनांक ०४ मे, २०१८ च्या शासन निर्णयाअन्वये घेतला आहे.

सदर प्रयोजनासाठी महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान या योजनेतून संबंधित नागरी स्वराज्य संस्थेच्या वर्गवारीनुसार नमूद वित्तीय आकृतिबंधानुसार निधी उपलब्ध करुन देण्यात येणार आहे.

नगरविकास विभागास उपलब्ध होणाऱ्या अतिरिक्त नियतव्ययातून सदर निधी उपलब्ध करुन दिला जाणार आहे.

---

## मराठवाडा (जि.औरंगाबाद) येथील एकमेव शासकीय दंत महाविद्यालय व रुग्णालयांमध्ये मुख्य औषधशास्त्र विषयामधील पदव्युत्तर अभ्यासक्रम बंद झाल्याबाबत

**(३२) ४३०२१ (०१-०८-२०१८). श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मराठवाडा (जि.औरंगाबाद) येथील एकमेव शासकीय दंत महाविद्यालय व रुग्णालयांमध्ये १९९७ पर्यंत मुख्य औषधशास्त्र विषयामध्ये सुरु असलेला पदव्युत्तर अभ्यासक्रम २० वर्षापासून बंद आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, याबाबतची सर्वसाधारण कारणे काय आहेत,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदर अभ्यासक्रम पुन्हा सुरु करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (०४-०२-२०१९) :** (१) मुखरोगनिदान व क्ष-किरणशास्त्र या विषयाचा पदव्युत्तर अभ्यासक्रम बंद आहे.
(२) मुखरोगनिदान व क्ष-किरणशास्त्र या विषयातील संबंधित संस्थेतील प्राध्यापक हे पद रिक्त असल्याने अभ्यासक्रमाची मान्यता खंडीत झाली आहे.
(३) भारतीय दंत परिषदेच्या अधिसूचनेतील तरतूदी विचारात घेऊन शासकीय दंत महाविद्यालय व रुग्णालय, औरंगाबाद या संस्थेतील मुखरोगनिदान व क्ष-किरणशास्त्र या विषयातील वरिष्ठ सहयोगी प्राध्यापकास पदोन्नतीच्या वरिष्ठ पदाचे प्राध्यापक हे नामाभिधान प्रदान करण्यास दिनांक १०/०५/२०१८

रोजीच्या आदेशाद्वारे शासन मान्यता देण्यात आली आहे. त्यानुषंगाने उक्त अभ्यासक्रम पुनश्च: सुरु करण्याचा प्रस्ताव विचाराधीन आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्य सहकारी बँकेच्या प्रशासकीय मंडळाच्या अध्यक्षांनी राजीनामा दिल्याबाबत

**(३३) ४३४११ (०१-०८-२०१८). श्री.जनार्दन चांदूरकर :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेच्या एका महत्वाच्या पदावरील अधिकाऱ्याला निवृत्तीनंतरही नियमबाहय मुदतवाढ देण्याच्या वादातून राज्य शासनाने नियुक्त केलेल्या आणि बँक भरभराटीला आणणाऱ्या प्रशासकीय मंडळाचे अध्यक्ष डॉ. एम.एल. सुखदेवे यांनी सहकार आयुक्तांकडे राजीनामा दिल्याचे दिनांक १२ मे, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, अध्यक्षांच्या या राजीनामामुळे राज्य सहकारी बँकेच्या कामकाजावर विपरीत परिणाम होत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार याप्रकरणी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (२५-०१-२०१९) :** (१) डॉ.एम.एल.सुखदेवे यांनी दिनांक १९/०४/२०१८ रोजी ई-मेलद्वारे सहकार आयुक्तांकडे राजीनामा दिला आहे. तथापि, राज्य बँकेने कोणत्याही महत्त्वाच्या पदावरील अधिकाऱ्याला मुदतवाढ दिलेली नाही.
(२) नाही.
(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात डॉक्टरेट तसेच नेट/सेट प्राध्यापकांना नोकरीत सामावून घेण्याबाबत

**(३४) ४३६७६ (०२-०८-२०१८). डॉ.सुधीर तांबे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.विक्रम काळे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात डॉक्टरेट तसेच नेट/सेट प्राध्यापकांना अनेक वर्षापासून नोकरीत सामावून न घेतल्यामुळे त्यांची उपासमार होत असल्याची बाब निदर्शनास आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, डॉक्टरेट प्राध्यापकांना शासकीय सेवेत सामावून घेण्याबाबत शासनाने धोरणात्मक निर्णय घेतला आहे काय,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०५-०२-२०१९) :** (१), (२) व (३) राज्यातील अकृषी विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालयामध्ये विद्यापीठ अनुदान आयोगाने दिलेल्या व राज्य शासनाने सुधारित केलेल्या शैक्षणिक अर्हता व पात्रतेनुसार व मान्य आकृतिबंधातील पदसंख्येच्या मर्यादेत शिक्षकीय पदांची भरती करण्यात येते. वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक २५/०५/२०१७ अन्वये पदभरतीस प्रतिबंध करण्यात आला होता. आता अशासकीय अनुदानित महाविद्यालयातील शिक्षकीय पदांच्या भरती प्रक्रियेची कार्यवाही सुरू आहे.

---

## शासकीय वैद्यकिय महाविद्यालय, लातूर येथील रुग्णालयात महिलेने आत्महत्या केल्याबाबत

**(३५) ४३७५९ (०१-०८-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) बुधोडा (ता.औसा, जि.लातूर) येथील महिलेने लातूरच्या शासकीय वैद्यकिय महाविद्यालयातील रुग्णालयात दिनांक ४/६/२०१८ रोजी वा त्यासुमारास आत्महत्या केल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या महिलेने आत्महत्या करण्याची कारणे काय आहेत,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने उक्त प्रकरणी दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (०५-०२-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) व (३) घडलेल्या प्रकाराची चौकशी करण्यासाठी रुग्णालय प्रशासनामार्फत चौकशी समिती गठीत करण्यात आली होती. सदर महिलेस गळफासा सोबत डोक्याला इजा झाल्याचे नमूद करुन उक्त प्रकरणात कुठल्याही प्रकारचा व्यावसायिक हलगर्जीपणा किंवा मानवाधिकाराचे उल्लंघन झाले नसल्याचे निष्कर्ष उक्त समितीने नोंदविले आहेत. सबब कोणावरही कार्यवाही करण्यात आलेली नाही. सदर प्रकाराबाबत रुग्णालय प्रशासनाने पोलीस विभागाकडे तक्रार नोंदविलेली असून पोलीस विभागामार्फत कार्यवाही सुरु आहे.
(४) लागू नाही.

---

## राज्यातील गृहनिर्माण संस्थांचे कामकाज अधिक लोकाभिमुख व पारदर्शक होण्यासाठी अधिनियमात सुधारणा करण्याबाबत

**(३६) ४४०३० (०५-१२-२०१८). श्री.किरण पावसकर, श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील गृहनिर्माण संस्थांचे कामकाज अधिक लोकाभिमुख व पारदर्शक करण्यासह त्याबाबतचे प्रशासन अधिक सुलभ, सुस्पष्ट व परिपूर्ण होण्यासाठी २०० पेक्षा कमी सभासद असलेल्या गृहनिर्माण संस्थांना निवडणूक आयोगाच्या कार्यकक्षेतून वगळून संस्था पातळीवर निवडणूक घेण्याची मुभा मिळावी म्हणून सहनिबंधक यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन समितीच्या अहवालानुसार महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियमात सुधारणा करण्याचा निर्णय राज्य मंत्रिमंडळाने दिनांक ३१ जुलै, २०१८ रोजी वा त्यासुमारास घेतला होता, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर निर्णयाच्या अंमलबजावणीबाबत कोणती कार्यवाही करण्यात आली वा येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (०५-०२-२०१९) :** (१) होय.

(२) दिनांक ३१/०७/२०१८ रोजीच्या मंत्रिमंडळाने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० मध्ये सहकारी गृहनिर्माण संस्थांसाठी स्वतंत्र प्रकरण समाविष्ट करण्यासंदर्भात दिनांक ३०/१०/२०१८ रोजीच्या शासन राजपत्रात अध्यादेश प्रख्यापित करण्यात आला. उक्त अध्यादेशाच्या अनुषंगाने सन २०१८ च्या हिवाळी अधिवेशनात विधेयक सादर करण्यात आले. परंतु विधानमंडळात विधेयकावर झालेल्या चर्चेवेळी मा.विधानसभा सदस्यांनी काही सुधारणा सूचविलेल्या आहेत. उक्त सूचविलेल्या सुधारणा विचारात घेऊन नव्याने अध्यादेश प्रख्यापित करण्याची कार्यवाही विभागामार्फत सुरु आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नागपूर शासकीय आयुर्वेदिक रूग्णालय येथे औषध साठा उपलब्ध नसल्यामुळे रूग्णांची गैरसोय होत असल्याबाबत

**(३७) ४४०४४ (०५-१२-२०१८). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.रामदास आंबटकर, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **वैद्‌यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर शासकीय आयुर्वेदिक रूग्णालय येथे औषध साठा उपलब्ध नसल्यामुळे रूग्णांची गैरसोय होत असल्याचे दिनांक १७ जुलै, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदर रूग्णालयात औषध साठा उपलब्ध करून देण्याबाबत कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (२९-०१-२०१९) :** (१) हे खरे नाही.
(२) प्रश्न उद्‌भवत नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात विशेषत: मराठवाडा व विदर्भात मानसोपचार महाविद्‌यालयात अभ्यासक्रम सुरू करण्याच्या प्रस्तावाबाबत

**(३८) ४४०९८ (०५-१२-२०१८). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.रामदास आंबटकर, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **वैद्‌यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात विशेषत: मराठवाडा व विदर्भात मानसोपचार महाविद्‌यालय नसल्याने मेयोचे डॉक्टर व मनोरूग्णालयाचा वार्ड असे मिळून अभ्यासक्रम सुरू करण्याचा प्रस्ताव असल्याचे दिनांक १७ ऑगस्ट, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने सदर प्रस्तावास मंजूरी देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (०४-०२-२०१९) :** (१) होय, अंशत: खरे आहे.
(२) भारतीय आयुर्विज्ञान परिषद यांच्या मानकांची पूर्तता होण्यासाठी सार्वजनिक आरोग्य विभाग यांच्या अखत्यारितील प्रादेशिक मनोरुग्णालय, नागपूर येथील खाटांचे संलग्निकरण इंदिरा गांधी शासकीय वैद्‌यकीय महाविद्‌यालय, नागपूर या महाविद्‌यालयाशी होणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने आवश्यक कार्यवाही सुरु आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अकोला येथील पोलीस वसाहतीची दुरवस्था झाल्याबाबत

**(३९) ४४४५३ (०५-१२-२०१८). श्री.गोपिकिशन बाजोरीया : तारांकित प्रश्न क्रमांक ३८१९१ ला दिनांक २८ फेब्रुवारी, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अकोला येथील पोलीस वसाहतीची अत्यंत दुरवस्था झाली असून सदर वसाहती अत्यंत लहान असल्याने पोलिसांना राहण्याच्यादृष्टीने अपुरे पडत असल्याचे माहे सप्टेबर, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, पोलिसांच्या वसाहतीच्या दुरुस्तीकरीता शासनाने निधीची तरतूद करुनही कोणत्याही प्रकारची निविदा प्रसिध्द केली नसल्याने पोलीस वसाहतीच्या नुतनीकरणाचे काम प्रलंबित आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार शासनस्तरावर काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०४-०२-२०१९) :** (१), (२) व (३) अकोला येथील पोलीस वसाहतीमधील निवासस्थाने दुरूस्तीचा प्रस्ताव जानेवारी, २०१९ मध्ये प्राप्त झाला आहे. निधीच्या उपलब्धतेनुसार उक्त प्रस्ताव शासनस्तरावर कार्यवाहीधीन आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील नगरपालिका व महानगरपालिकांमध्ये काही विशिष्ट पदे अनेक वर्षापासून रिक्त असल्याबाबत

**(४०) ४४६०४ (०५-१२-२०१८). श्री.विप्लव बाजोरिया :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील २३० नगरपालिका व २३ महानगरपालिकांमध्ये कार्यरत असलेल्या कर्मचारी वर्ग, नगररचनाकार, सहायक आयुक्त, उपायुक्त,

लेखापरिक्षक, अभियंते त्याचबरोबर वर्ग २ व वर्ग ४ च्या कर्मचाऱ्यांच्या पदस्थापनेसंदर्भात कोणतेही स्पष्ट धोरण नसल्याने बहुतांश कर्मचारी वर्ग बराच कालावधीत एकाच पदावर राहत असल्याचे माहे सप्टेंबर, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) तसेच परभणी महानगरपालिकेस रिक्त पदांचा अनुशेष मोठ्या प्रमाणात असून महानगरपालिकेत सहायक आयुक्त, उपसंचालक नगररचना, सहायक संचालक नगररचना व इतर महत्वाची पदे रिक्त आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, शासनाच्या प्रचलित नियमानुसार तीन वर्षानंतर बदलीचे धोरण असतानाही एकाच पदावर गत १० ते १५ वर्ष कर्मचारी काम करीत असल्याने नगरपरिषद व मनपामध्ये काही विशिष्ट पदे अनेक वर्षापासून रिक्त असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त पदे रिक्त असल्यामुळे कामाचा ताण नायब तहसिलदार किंवा तहसिलदार यांच्यावर येत असल्याने कर्मचाऱ्याच्या पदस्थापनेबाबत धोरण आखण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे व त्याची अमंलबजावणी केव्हापर्यंत होणे अपेक्षित आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०४-०२-२०१९) :** (१) हे खरे नाही.

नगरपरिषद/नगरपंचायत राज्यस्तरीय संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या सर्वसाधारण बदल्यांबाबतचे धोरण दिनांक ११/०५/२०१७ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आले आहे. सदर बदली धोरणानुसार संचालनालयाकडून नियमित कार्यवाही करण्यात येत आहे.

(२) अंशत: खरे आहे.

तथापि, सहायक आयुक्त व इतर रिक्त पदांवर अधिकारी उपलब्ध करुन देण्याची प्रक्रिया करण्यात येत आहे.

(३) व (४) राज्यातील नगरपरिषद/नगरपंचायतीमधील संवर्ग कर्मचाऱ्यांची रिक्त पदे भरण्याच्या दृष्टीने शासनाने १८८९ पदे भरण्यास मान्यता दिली आहे.

त्यानुसार संचालनालयाने सरळसेवा भरती प्रक्रिया राबवून अद्यापपर्यंत सुमारे १५०० अधिकारी/ कर्मचाऱ्यांची भरती प्रक्रिया पूर्ण केली आहे. तसेच, सदर अधिकारी/कर्मचारी यांना नियुक्तीही देण्यात आली आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## आदिवासी आश्रम शाळेतील रॅगिंगचा प्रकार थांबविण्याबाबत

**(४१) ४४८४६ (०५-१२-२०१८). श्री.गिरीशचंद्र व्यास, प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.रामदास आंबटकर :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) उदासा (जि.नागपूर) या गांवातील आश्रमशाळेतील दुसऱ्या वर्गाच्या देवांशु मसराम या विद्यार्थ्याला आश्रमशाळेतील मोठ्या मुलानी दिनांक १९ जुलै, २०१८ रोजी वा त्यासुमारास पायावर दंड्याने मारले, नखाने ओरबडले व रॅगींग घेवून विद्यार्थ्यांला त्रास दिला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या रॅगींगमुळे विद्यार्थी अत्यंत घाबरला असून शाळेत येणाच्या मनःस्थितीत नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व शाळा तसेच आदिवासी विभागाने कोणत्या स्वरुपाची कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (०२-०२-२०१९) :** (१) हे खरे नाही.
(२) व (३) अनुदानित आश्रमशाळा उदासा या शाळेतील विद्यार्थी देवांशु क्रिष्णा मसराम या विद्यार्थ्याला शाळेतील मोठ्या मुलांनी त्रास दिल्याबाबत लोकमत वृत्तपत्रामध्ये दिनांक ३०/०७/२०१८ रोजी बातमी प्रकाशित झाली होती.

सदर प्रकरणी सहायक प्रकल्प अधिकारी व कनिष्ठ शिक्षण विस्तार अधिकारी यांनी प्रत्यक्ष शाळेला भेट देऊन संबंधितांचे लेखी म्हणणे घेतले. त्यानुसार सदर विद्यार्थी जेव्हापासून शाळेत दाखल झाला तेव्हापासून त्याला

नेहमी घरची आठवण येत होती. त्याची मानसिकता शाळेत शिकण्याची नव्हती, असे दिसून येते. सदर विद्यार्थ्याला शाळेतील कोणत्याही मुलाने मारहाण केलेली नाही. याबाबत सदर विद्यार्थ्याची आई श्रीमती सुचिता मसराम यांनी प्रकल्प कार्यालय, नागपूर येथे समक्ष उपस्थित राहून लेखी म्हणणे दिले असून त्यांच्या मुलाला मोठ्या मुलांनी मारहाण केल्याप्रकरणी कोणताही आक्षेप नोंदविला नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबईतील राणीबागेत नवीन प्राण्यांसाठी पारदर्शक आणि वातावरणाला अनुकूल असणारे पिंजरे उभारण्याबाबत

**(४२) ४४९३१ (०५-१२-२०१८). श्री.अमरिशभाई पटेल, श्री.शरद रणपिसे, अ‍ॅड.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईतील राणीबागेत नवीन प्राण्यांसाठी पारदर्शक आणि वातावरणाला अनुकूल असणारे पिंजरे उभारण्याचे कंत्राट यापूर्वी वादग्रस्त ठरलेल्या हायवे कन्स्ट्रक्शनला पुन्हा देण्याचा प्रस्ताव स्थायी समितीने मंजूर केला असल्याचे माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०४-०२-२०१९) :** (१) व (२) हम्बोट पेंग्वीन पक्ष्यांकरीता दर्शनीय गॅलरी उभारणीच्या कामासंबंधी झालेल्या दिरंगाईबाबत मा.लोकायुक्त, मुंबई यांनी दिनांक ११/०८/२०१७ रोजी दिलेल्या आदेशानुसार, बृहन्मुंबई महानगरपालिकेचे अतिरिक्त आयुक्त (शहर) यांच्या अध्यक्षतेखाली चौकशी करुन, हम्बोट पेंग्वीन कक्ष उभारणीच्या कामास झालेल्या विलंबाबाबत मे. हायवे कन्स्ट्रक्शन कंपनीकडून उचित दंड वसुली करण्यात आली आहे.

तसेच, प्राणीसंग्रहालयामध्ये येणाऱ्या नवीन प्राण्यांसाठी वातावरणास अनुकूल असे १० नवीन पिंजरे बांधण्याकरीता लघुत्तम निविदाकार मे. हायवे कन्स्ट्रक्शन कंपनी यांची स्थायी समितीच्या दिनांक ०८/०८/२०१८ रोजीच्या ठरावानुसार नियुक्ती करण्यात आली असल्याचे बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## परभणी शहरातील शासकीय जमिनीबाबत

**(४३) ४५००२ (०५-१२-२०१८). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) परभणी शहरातील सर्वे नंबर १४९ मधील १४७६ एकर जमिनीवर बलदीया सरकार असे नमुद असल्याने त्यावरील बांधकामे हस्तांतरण करण्यास अडचण येत असल्याने महसूल, विधी व न्याय व नगरविकास विभाग यांच्या बैठकीवरून अंतिम कार्यवाही करण्यात येईल असे आश्वासन मा.राज्यमंत्री, नगरविकास विभाग यांनी माहे मार्च, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान विधानसभेत दिले होते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर तिन्ही विभागाच्या बैठका बोलावून त्यात कोणता अंतिम निर्णय घेण्यात आला वा येत आहे व याबाबतची सविस्तर माहिती काय आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०४-०२-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) याबाबतची बैठक घेण्याचे प्रस्तावित केलेले आहे. तथापि, सद्य:स्थितीत परभणी महानगरपालिकेतर्फे नवीन बांधकाम व दुरुस्त्यांना परवानगीसह फेरफार प्रकरणात सन २०१५ पुर्वी ज्याप्रमाणे कार्यवाही सुरु होती, तशी कार्यवाही महानगरपालिकेकडून सुरु असल्याचे परभणी महानगरपालिकेने कळविलेले आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नवी मुंबई महानगरपालिकेच्या स्थापनेपासून क्षेत्रसभा आयोजित केली नसल्याबाबत

**(४४) ४५०१८ (०५-१२-२०१८). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात महानगरपालिका अधिनियम कलम २९ (ब) व (क) नुसार महानगरपालिका क्षेत्रात दर सहा महिन्यांनी क्षेत्र सभा घेणे बंधनकारक करण्यात आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, नवी मुंबई महानगरपालिकेच्या स्थापनेपासून गत २५ वर्षात क्षेत्रसभा आयोजित केली नसल्याबाबतच्या तक्रारी कोकण विभागीय आयुक्तांकडे प्राप्त झाल्याचे माहे जुलै, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनात आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०२-०२-२०१९) :** (१) हे खरे आहे.

(२) या विषयाबाबत तक्रारदार श्री.मंगेश म्हात्रे यांनी कोकण आयुक्त यांचेकडे दिनांक १९/०७/२०१८ रोजी तक्रार केली आहे.

(३) विभागीय आयुक्त, कोकण विभाग कार्यालयाने सदर तक्रार दिनांक ३/१०/२०१८ च्या पत्रान्वये नियमोचित कार्यवाहीसाठी आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांचेकडे पाठविली आहे.

सदर पत्रानुसार कार्यवाही कार्यप्रणालीत असल्याचे उपआयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांनी कळविले आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## यवतमाळ जिल्ह्यातील राज्य परिवहन महामंडळातील रिक्त पदे भरण्याबाबत

**(४५) ४५१७० (३०-११-२०१८). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) यवतमाळ जिल्ह्यातील राज्य परिवहन महामंडळातील विविध संवर्गातील पदे रिक्त असल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त पदे केव्हापासून रिक्त आहेत व सदरहू पदे रिक्त असण्याची कारणे काय आहेत,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन रिक्त पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (०५-०२-२०१९) :** (१) होय.

(२) राज्य परिवहन महमंडळातील विविध संवर्गातील पदे ही सेवानिवृत्ती, स्वेच्छानिवृत्ती, पदोन्नती, राजीनामा इत्यादी कारणांमुळे रिक्त होतात.

(३) राज्य परिवहन महमंडळातील वर्ग-२ वरिष्ठ/कनिष्ठ या पदांवर तात्पुरती बढतीने व बदलीने नेमणूका देण्याबाबतची कार्यवाही महामंडळाद्वारे सुरु आहे. तसेच, सरळ सेवा भरती सन २०१६-१७ अंतर्गत सहाय्यक (कनिष्ठ) व लिपिक-टंकलेखक (कनिष्ठ), लेखाकार/कनिष्ठ संग्रह पडताळक, भांडारपाल, सहाय्यक कार्यशाळा अधिक्षक (क), कनिष्ठ अभियंता (स्था) या संवर्गातील रिक्त पदांवर उमेदवारांची नियुक्ती करण्यात आलेली आहे.

वरिष्ठ लिपिक, सहाय्यक वाहतूक निरीक्षक, वाहतूक नियंत्रक, तसेच, यांत्रिक प्रवर्गातील प्रमुख कारागीर, कारागीर (क), सहाय्यक कारागीर व वाहन परिक्षक इ. रिक्त पदे पदोन्नतीद्वारे भरण्याबाबतची कार्यवाही महामंडळाद्वारे सुरु आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

# मुंबई महानगरपालिकेच्या पूर्व उपनगरातील चौक्यांवरील कामगार मूलभूत सुविधाविना काम करित असल्याबाबत

**(४६) ४५१९४ (०५-१२-२०१८). श्री.प्रविण दरेकर, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई महानगरपालिकेच्या पूर्व उपनगरातील १२ वर्षापूर्वीच्या ५ चौक्यांवरील २५० कामगार मूलभूत सुविधाविना काम करित असून आजपर्यंत तेथे कोणत्याही दुरुस्तीची कामे झाली नसल्याचे माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार ५ चौक्यांतील कर्मचाऱ्यांना मूलभूत सुविधा न पुरविण्यासंदर्भात कोणाला जबाबदार ठरविण्यात आले असून त्यांचेवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०४-०२-२०१९) :** (१) बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या पूर्व उपनगरात एकूण ५७ स्थापत्य चौक्या व ३३ कंटेनर्स चौक्या घन कचरा व्यवस्थापन विभागाच्या कामगारांकरीता पुरविण्यात आल्या आहेत.

सदर चौक्यांची दुरुस्ती वेळोवेळी करण्यात येत असल्याचे बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.

(२) सदर प्रकरणी कोणत्याही प्रकारची चौकशी करण्यात आली नसल्याचे महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## अमरावती विभागातील व्यवसाय शिक्षण विभागात नोंदणीकृत संघटनेच्या कर्मचाऱ्यांने आर्थिक गैरव्यवहार केल्याबाबत

**(४७) ४५३०८ (०५-१२-२०१८). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अमरावती विभागातील व्यवसाय शिक्षण विभागात एका नोंदणीकृत संघटनेच्या कर्मचाऱ्यांने संघटनेच्या अधिकृतपणे प्रकाशित होणाऱ्या नियतकालिकेमध्ये प्रचंड आर्थिक गैरव्यवहार केला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर कर्मचाऱ्याने कार्यालयामध्ये उपस्थित न राहता हजेरी पत्रकावर सह्या केल्या असून ते कर्तव्यावर नसतानाही आर्थिक लाभ घेत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, संबंधित कर्मचाऱ्यावर फौजदारी गुन्हे दाखल करण्याचे आदेश विधी व प्रशासनाने दिल्यानंतरही अद्यापपर्यंत गुन्हे दाखल करण्यात आलेले नाही, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार दोषी कर्मचाऱ्यावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (०५-०२-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) होय, हे खरे आहे.

(३) नाही.

उपविभागीय अधिकारी तथा दंडाधिकारी, अमरावती कार्यालय यांचे दिनांक ०७/०७/२०१४ च्या पत्रान्वये प्रेस ॲण्ड रजिस्ट्रेशन ऑफ बुक ॲक्ट १८६७ मधील ३, ४, ५ व ८ चे उल्लंघन झालेले आहे व खोटे दस्तऐवजांचे आधारे शासनाची फसवणुक केली असल्याचे दिसून येत असल्यामुळे “निदेशक मित्र” या मासिकाचे अवैध प्रकाशन करणाऱ्या संपादक, सहसंपादक तसेच मुद्रक यांचेविरुध्द गुन्हा दाखल करण्यात यावे, असे पोलीस स्टेशन, गाडगेनगर, अमरावती यांना कळविण्यात आले होते. त्यानुसार पोलीस

स्टेशन, गाडगेनगर, अमरावती येथे अदखलपात्र गुन्हा नोंदणी क्रमांक ९४६/१४ दिनांक १०/०७/२०१४ अन्वये दाखल करण्यात आला आहे.
(४) व (५) होय.

अमरावती विभागातील महाराष्ट्र राज्य आय.टी.आय. निदेशक संघटनेचे सरचिटणीस असलेले श्री.भोजराज वामन काळे, शिल्प निदेशक हे “निदेशक मित्र” या मासिकाचे संपादक तसेच श्री.विजय नारायण भारती शिल्प निदेशक हे “निदेशक मित्र” या मासिकाचे सहसंपादक होते. ते “निदेशक मित्र” हे मासिक अवैधरित्या प्रसारित करुन त्याद्वारे अपहार करीत असल्याच्या तक्रारीच्या अनुषंगाने चौकशी करुन चौकशी अहवालाअंती दोन्ही कर्मचाऱ्यांविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही केली होती. विभागीय चौकशीत दोषी आढळून आल्याने सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, अमरावती यांच्या दिनांक २९/०७/२०१० च्या आदेशान्वये संबंधित कर्मचाऱ्यांना शासकीय सेवेतुन बडतर्फ करण्यात आल्याची शिक्षा देण्यात आलेली होती. संबंधित कर्मचाऱ्यांनी या शिक्षेच्या विरुध्द व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयास केलेल्या अपिल अर्जावर अपिलाअंती व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाने दिनांक ११/०६/२०१२ च्या आदेशान्वये त्यांना सेवेमध्ये पुनर्स्थापीत करुन त्यांच्या कायमस्वरुपी तीन वेतनवाढी थोपवून ठेवण्याची शिक्षा देण्यात आलेली आहे.

---

## राज्यात प्रदर्शनरुपी विश्‍वरथ बस सुरु करण्याबाबत

**(४८) ४५७६५ (३०-११-२०१८). श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्य परिवहन महामंडळाच्या बसेसचा ७० वर्षांचा प्रवास उलगडणाऱ्या विश्‍वरथ या फिरत्या प्रदर्शनाचा प्रवास महामंडळाच्या दुर्लक्षतेमुळे गत वर्षभरात बसची एकही धाव होऊ शकली नसल्याचे माहे ऑगस्ट, २०१८ च्या चौथ्या आठवड्यात निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, माहे सप्टेंबर, २०१६ पासून सुरुवातीच्या आठ महिन्यांत ३६ जिल्ह्यांपैकी मुंबई, ठाणे, पुणे, सिंधुदुर्ग व कोल्हापूर या पाच जिल्ह्यातच या बसने प्रवास केला होता, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, पुणे ते अहमदनगर अशी पहिली बस सन १९४८ साली धावली तेव्हापासून आतापर्यंतचा इतिहास सांगण्यासाठी प्रदर्शनरुपी विश्वरथ नावाने बस चालविण्याचा निर्णय राज्य परिवहन महामंडळाने घेतला होता, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने प्रदर्शनरुपी विश्वरथ बस राज्यातील सर्व जिल्ह्यात सुरु करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (०५-०२-२०१९) :** (१), (२), (३) व (४) एस.टी. प्रेमी संघटना व महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ यांचे संयुक्तिक विद्यमाने मुंबई, ठाणे, पुणे, सिंधुदुर्ग व कोल्हापूर या ५ जिल्हयांमधील सर्व आगार व बसस्थानकात राज्य परिवहन महामंडळाच्या बसेसचा ७० वर्षाचा प्रवास उलगडणारा प्रदर्शनरुपी विश्वरथ दाखविण्यात आला आहे.

स्वयंसेवी संघटनेचे सदस्य हे आपला व्यवसाय सांभाळून व उपलब्ध असणाऱ्या वेळेनुसार काम करीत असल्याने त्यांचेद्वारे संपूर्ण राज्यात प्रदर्शनरुपी विश्वरथ जावू शकलेला नाही. परंतु, पुढील काळात महाराष्ट्रातील सर्व प्रमुख बसस्थानकांवर प्रदर्शनरुपी विश्वरथ दाखविण्याचे निर्देश महामंडळास देण्यात आलेले आहेत.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## देवदत्त पर्यटन ॲण्ड टुरिझम संस्थेला नॅशनल पार्कमधील स्वच्छतागृहाच्या देखभालीची व अंतर्गत प्रवासी वाहतूकीचे काम देणेबाबत

**(४९) ४५९५९ (०५-१२-२०१८). श्री.प्रविण दरेकर, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.नागोराव गाणार, श्री.विजय उर्फ भाई गिरकर :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) देवदत्त पर्यटन ॲण्ड टुरिझम संस्थेला नॅशनल पार्कमधील स्वच्छतागृहाच्या देखभालीची व अंतर्गत प्रवासी वाहतूकीचे काम देणेबाबत स्थानिक लोकप्रतिनिधींनी दिनांक ८ जुलै, २०१८ रोजी वा त्यासुमारास मा.पर्यटन मंत्री यांना लेखी निवेदन दिले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त निवेदनानुसार शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (०८-०२-२०१९) :** (१) हे खरे आहे.
(२) व (३) नॅशनल पार्कमधील स्वच्छतागृहाच्या देखभालीची व अंतर्गत प्रवासी वाहतूकीचे कामे ई-निविदाद्वारे करणे प्रस्तावित असल्याने देवदत्त पर्यटन ॲण्ड टुरिझम संस्थेस सहभागी होता येईल.

---

## पुणे विद्यापीठातील रिक्त पदे भरण्याबाबत

**(५०) ४६२०० (३०-११-२०१८). श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पुणे विद्यापीठात उपकुलसचिव, सहाय्यक कुलसचिव, कक्ष अधिकारी, उच्चश्रेणी लघुलेखक, सहाय्यक अभियंता, लेखानिक, शिपाई आदि पदे भरण्यास शासनाने सन २०१५ पासून बंदी केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुषंगाने सदर रिक्त पदे भरण्यासंदर्भात कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०५-०२-२०१९) :** (१) अंशत: खरे आहे. वित्त विभागाच्या दिनांक २५ मे, २०१७ च्या शासन निर्णयान्वये आकृतिबंध निश्चित झाल्याशिवाय पदभरती करता येणार नाही. अशा सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत.

(२) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत दिनांक ०६/०९/२०१८ च्या पत्रान्वये सर्व अकृषी विद्यापीठांच्या सुधारित आकृतिबंधाचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला असून याबाबत दिनांक ०१/११/२०१८ रोजी सचिव स्तरावर सर्व अकृषी विद्यापीठांचे कुलसचिव यांची बैठक घेण्यात आली. सदरहू बैठकीमध्ये विद्यापीठांनी पाठविलेले आकृतिबंधाचे प्रस्ताव वित्त विभाग, शासन परिपत्रक, दिनांक २९ जून, २०१७ अन्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार नसल्याने वित्त विभागाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार सुधारित प्रस्ताव संचालक, उच्च शिक्षण यांच्यामार्फत शासनास सादर करण्याबाबत सर्व अकृषी विद्यापीठांना सूचित करण्यात आलेले आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**जितेंद्र भोळे**
**सचिव (कार्यभार),**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

---

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.